**श्रीमती निशिगंधा प्रसाद कुमार, सहायक कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग यांच्यासाठी निर्माण केलेले अधिसंख्य पद रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र २७२४/प्र.क्र.६६/प्रशा-३ (१४-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० एप्रिल, २०२४

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एएससी-१५१९/प्र.क्र.१९१/१४-अ, दि. १८.०१.२०२०
२) मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांचे रिट याचिका क्र. ६३५९/२०१६ मधील दि. १२.०१.२०१७ रोजीचे आदेश.

**शासन निर्णय**

शासनाच्या दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या धोरणात्मक निर्णयानुसार, मंत्रालयीन संवर्गातील ५० अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी संदर्भ क्र. १ येथील दिनांक १८.०१.२०२० च्या शासन निर्णयानुसार अधिसंख्य पदे निर्माण करून प्रशासकीय विभागाना संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबत कळविण्यात आले होते. यामध्ये श्रीमती निशिगंधा प्रसाद कुमार यांच्या नावाचा समावेश होता.

श्रीमती कुमार यांच्या रिट याचिका क्र. ६३५९/२०१६ च्या प्रकरणी दिनांक १२.०१.२०१७ रोजी दिलेले आदेश व त्याअनुषंगाने दाखल केलेली अवमान याचिका विचारात घेऊन, मा. सर्वोच्च न्यायालयात राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २५३०/२०२२ प्रकरणी होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून, श्रीमती कुमार यांच्या सेवा खुल्या प्रवर्गात संरक्षित करण्यात येत असून त्यांच्या करीता निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पद रद्द करण्यात येत आहे.

हा शासन आदेश विधि व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३०४-२०२४/E, दिनांक २४-०४-२०२४ अन्वये व सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०९/२०२४/आरक्षण-२ दि. २५-०४-२०२४ अन्वये प्राप्त अभिप्रायाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०४३०१२२५४२९२०७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.04.30 12:38:25 +05'30'

(वि. बा. माने)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

६) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.

७) सहसचिव (आरक्षण-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) सहसचिव/उपसचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) कक्ष अधिकारी (कार्यासन-आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) संबंधित कर्मचारी (मार्फत कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.)

११) निवडनस्ती/प्रशा-३ (१४-अ)